गेल इंडिया लि.या कंपनीची दाभोळ-कोल्हापूर-बंगलोर पाईपलाईन कार्यान्वित करण्यासाठी उच्चाधिकार समिती स्थापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र. आयडीसी-२०१०/(प्र.क्र.७५०)/उद्योग-१४,
मंत्रालय,मुंबई -४०००३२.
दिनांक :- ६ सप्टेंबर,२०१०.

वाचा:- (१)शासन निर्णय,उ.ऊ. व का.वि.क्र.एमजीएल-१००६/प्र.क्र.२५८/उद्योग-१४,दि.१० मे,२००६
(२)मे.गेल(इंडिया)लि. यांचे पत्र क्र.सीएमडी/०७/२०१०/१०४५.दि.५ जुलै,२०१०.
(३) पत्र क्र.गेल./डीबीपीएल/जीओएम/२०१०/७४, दि.१५ जुलै, २०१०

**प्रस्तावना :**

महाराष्ट्रातील वीजेची समस्या लक्षात घेता दाभोळ विद्युत प्रकल्प लवकरात लवकर पूर्ण करण्याकरीता दहेज ते उरण नॅचरल गॅस पाईपलाईन टाकण्यासंदर्भात गेल(इंडिया) या कंपनीने महाराष्ट्र शासनाकडून विशेष मदतीची अपेक्षा केली होती. त्यासाठी विविध विभागांशी संपर्क प्रस्थापित करून त्यांच्याकडून जलदगतीने परवानगी मिळणेसाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयाद्वारे मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समिती स्थापन करण्यात आली होती. सदर कंपनीने उपरोक्त पाईपलाईन टाकण्याचे काम पूर्ण केले असून ती पाईपलाईन कार्यान्वित केली आहे.

तसेच केंद्र शासनाने दाभोळ-कोल्हापूर-बंगळुरू गॅस पाईपलाईन प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी मे.गेल(इंडिया) लि.यांना प्राधिकार दिले आहेत. त्यानुसार कंपनीच्या दाभोळ-बंगलोर पाईपलाईनचे काम ऑक्टोबर २०१० पासून सुरु होणार असून ते नियोजित वेळापत्रकानुसार डिसेबर २०११ पासून कार्यान्वित करण्याचे प्रस्तावित आहे.सदर पाईपलाईनचे काम पूर्ण होण्याकरीता वापराचे अधिकार प्राप्तीसाठी जमीन संपादन व अनुषंगिक कामे करणे आवश्यक असून त्यासाठी राज्य शासनाने आवश्यक सहकार्य करावे व सदर पाईपलाईनच्या प्रकल्पासाठी पूर्वीप्रमाणेच उच्चाधिकार समिती नियुक्त करावी अशी विनंती कंपनीने केली आहे. त्यानुसार कंपनीच्या दहेज-उरण पाईपलाईन प्रकल्पाबाबत संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे स्थापन केलेली उच्चाधिकार समिती रद्द करुन कंपनीच्या दाभोळ-कोल्हापूर-बंगलोर पाईपलाईन प्रकल्पाकरिता विविध विभागांशी संपर्क प्रस्थापित करुन त्यांच्याकडून जलदगतीने परवानग्या मिळण्यासाठी मा.मुख्य

सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संबंधित सर्व विभागांच्या सचिवांचा समावेश असलेली नवीन उच्चाधिकार समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मे. गेल(इंडिया) लि. या कंपनीच्या दहेज-उरण गॅस पाईपलाईन प्रकल्पासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाद्वारे स्थापन केलेली समिती याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

२. आता गेल इंडिया लि. या कंपनीने त्यांच्या दाभोळ-कोल्हापूर-बंगलोर गॅस पाईपलाईन प्रकल्पासंदर्भात महाराष्ट्र शासनाकडून विशेष मदतीची अपेक्षा केली आहे, त्या अनुषंगाने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समिती गठीत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या समितीची रचना खालील प्रमाणे असेल:-

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव (वने) | सदस्य |
| ३) | अपर मुख्य सचिव (महसूल) | सदस्य |
| ४) | अपर मुख्य सचिव (गृह) | सदस्य |
| ५) | प्रधान सचिव(नगर विकास ) | सदस्य |
| ६) | प्रधान सचिव (उद्योग) | सदस्य |
| ७) | सचिव (ग्राम विकास) | सदस्य |
| ८) | सचिव(जल संपदा) | सदस्य |
| ९) | सचिव (सार्वजनिक बांधकाम) | सदस्य |
| १०) | मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र औद्योगिक महामंडळ | सदस्य |
| ११) | अध्यक्ष,नॅशनल हायवे अथॉरिटी ऑफ इंडिया यांचे प्रतिनिधी. | सदस्य |
| १२) | व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र पेट्रोकेमिकल्स महामंडळ मर्या. | सदस्य-सचिव |

३. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१. उपरोक्त सर्व विभागांशी संबंधित आवश्यक परवानग्या जलदगतीने मिळण्यासाठी कंपनीस सहाय्य करणे.

२. महसूल विभागाच्या भूसंपादन व मोबदला वाटपाचे काम तातडीने पूर्ण करुन घेणे.

३. दाभोळ-कोल्हापूर-बंगलोर प्रकल्प लवकरात लवकर कार्यान्वित होण्यासाठी या कंपनीस मदत करणे.

४.	व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पेट्रोकेमिकल्स महामंडळ मर्या. हे या समितीचे सदस्य- सचिव म्हणून काम पाहतील.तसेच समितीस कार्यालयीन सहाय्य पुरवतील व आवश्यक बैठकांचे आयोजन करतील.

५.	सदर शासन निर्णय शासनाच्या www.maha.gov या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९०६१७५८१२००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(र.ल.लखोटे)
कार्यासन अधिकारी.

प्रति,

मुख्य सचिव
अपर मुख्य सचिव (वने)
अपर मुख्य सचिव (महसूल)
अपर मुख्य सचिव (गृह)
प्रधान सचिव(नगर विकास )
प्रधान सचिव (उद्योग)
सचिव (ग्राम विकास)
सचिव(जल संपदा)
सचिव (सार्वजनिक बांधकाम)
मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र औद्योगिक महामंडळ,मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र पेट्रोकेमिकल्स महामंडळ मर्या.,
व्यवस्थापकीय संचालक,मे.गेल(इंडिया लि.),मुंबई,
अध्यक्ष,नॅशनल हायवे अथॉरिटी ऑफ इंडिया,
निवड नस्ती(उद्योग-१४)

D:\RLL\Gail(India)Ltd-Dabhol-Kolhapur-Bangluru Pipeline.doc